**१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार Million Plus Cities अंतर्गत सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षातील Air Quality साठीच्या बधंनकारक (Tied) अनुदानाचा पहिला हप्ता वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफएफसी-२०२०/प्र.क्र.८६/नवि-४**
**मंत्रालय, मुंबई- ४०००३२**
**दिनांक :- ९ नोव्हेंबर,२०२०**

**वाचा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एफएफसी २०२०/प्र.क्र.५६/नवि-०४, दि.२८.१०.२०२०

२. केंद्र शासनाचे पत्र क्रमांक F१५(०३) /FC-XV/FCD/२०२०-२५,दिनांक ०२.११.२०२०.

**प्रस्तावना :-**

१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाचा सन २०२०-२१ करीता पहिला अहवाल व केंद्र शासनाचे स्पष्टीकरणात्मक ज्ञापन प्राप्त झाले आहे. यानुसार वाचा येथील दिनांक ०२ नोव्हेंबर,२०१९ च्या आदेशान्वये १५ व्या वित्त आयोगाअंतर्गत Million Plus Cities गटाकरीता सन २०२०-२१ वर्षाचे Air Quality साठीचे रु. ३९६.५० कोटी इतके अनुदान प्राप्त झालेले असुन सदर अनुदान Million Plus Cities गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्र शासनाकडून संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये मुक्त करण्यात आलेला सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षातील Million Plus Cities गटासाठी Air Quality साठीच्या बंधनकारक (Tied) अनुदानाचा पहिला हप्ता रु. ३९६.५० कोटी Million Plus Cities गटातील सोबतच्या परिशिष्टातील स्तंभ ४ मध्ये नमुद केल्याप्रमाणे महानगरपालिकांना परिशिष्टातील स्तंभ ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. **निधीच्या विनियोगाबाबतची कार्यपद्धती स्वतंत्रपणे आदेशाद्वारे कळविण्यात येईल.**

**२.** बृहन्मुंबई नागरी समुहात सर्वाधीक लोकसंख्या असलेल्या बृहन्मुंबई महानगरपालिकेस व पुणे नागरी समुहात सर्वाधीक लोकसंख्या असलेल्या पुणे महानगरपालिकेस नोडल संस्था निश्चित करण्यात येत आहे. बृहन्मुंबई नागरी समुहास चिन्हांकित निधी बृहन्मुंबई महानगरपालिकडे व पुणे नागरी समुहास चिन्हांकित निधी पुणे महानगरपालिकडे वितरीत करण्यात येत आहे. बृहन्मुंबई नागरी समुह व पुणे नागरी समुहात समावीष्ठ नागरी स्थानिक संस्थानिहाय अंतर्गत वितरणाचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. पुढील आदेशाशिवाय बृहन्मुंबई व पुणे महानगरपालिकांना सदर निधीचे वितरण अथवा विनियोग करण्यास प्रतिबंध करण्यात येत आहे.

**३.** सदर रु. ३९६.५० कोटी इतकी रक्कम, सोबतच्या परिशिष्टानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना वितरित करण्यासाठी उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्याकडे सुपूर्द

करण्यात येत आहे. उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सोबतच्या परिशिष्टानुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या हिश्शाची रक्कम आर.टी.जी.एस. द्वारे **तात्काळ** वितरित करण्याची कार्यवाही करावी.

**४.** सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या १५ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाच्या रकमेचे विहित नमुन्यातील विनियोग प्रमाणपत्र तात्काळ उप संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी शासनाकडे सादर करावे. सदर अनुदानातून खर्च करताना शासन निर्गमित करेल अशा शासन निर्णयातील तरतुदीनुसार तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार करणे बंधनकारक राहील. सदरचे अनुदान **"सशर्त"** म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

**५.** १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशी नुसार **सन २०२०-२०२१ करिता प्राप्त झालेला** Million Plus Cities **गटासाठी** Air Quality **साठीच्या बंधनकारक (Tied) अनुदानाचा पहिला हप्ता** Million Plus Cities गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना वितरीत करण्यांत येत असून सदरचा खर्च हा "मागणी क्र.एफ-२,२२१७ नगर विकास, ०५,इतर नगर विकास योजना,१९१,नागरी स्थानिक संस्था, नागरी विकास प्राधिकरण,नागरी विकास बोर्ड इत्यादींना सहाय्य,(००)(०३) पंधराव्या वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सहायक अनुदाने (अनिवार्य), (२२१७ A३१४) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशिर्षांतर्गत सन २०२०-२०२१ या चालू वित्तीय वर्षाकरीता उपलब्ध असणाऱ्या तरतूदीमधून खर्ची घालण्यांत यावा.

**६.** सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी तसेच संबंधित सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**७.** सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाची अनौपचारीक संदर्भ क्र.३०/२०२०/विकाअ,दिनांक ९ नोव्हेंबर,२०२० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक (२०२०११०९१६०३००७४२५) असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Sharad Gyanoba Kirwale

Digitally signed by Sharad Gyanoba Kirwale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ed23302d612eecfa1f6e35cc7ef096ce9dc6a6c617b767e8f74743b779e2b96, serialNumber=c631899d874203cfe881c8e1591d8fbaa6668e6f09ef06648708b4b914985e5c, cn=Sharad Gyanoba Kirwale
Date: 2020.11.10 15:14:53 +05'30'

**(शरद किरवले)**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव

२. मा.राज्यमंत्री ( नगर विकास ) यांचे खाजगी सचिव
३. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त व संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. आयुक्त, सर्व संबंधीत महानगरपालिका
११. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगरपंचायती
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. प्रधान सचिव, नगर विकास-१ विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव,नगर विकास-२, यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती, नवि-४ कार्यासन , नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

शासन निर्णय क्रमांकः- एफएफसी-२०२०/ प्र.क्र.८६/नवि-४ ,दिनांक ९ नोव्हेंबर,२०२० सोबतचे परिशिष्ट.

| अ. क्र. | नागरी समुह/शहर | समावीष्ठ ULBs | नोडल संस्था | वितरीत निधी (रु.कोटीत) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | औरंगाबाद नागरी समुह | औरंगाबाद मनपा | औरंगाबाद मनपा | १६.०० |
| २ | बृहन्मुंबई नागरी समुह | १.बृहन्मुंबई मनपा<br>२.मिरा-भायंदर मनपा<br>३. ठाणे मनपा<br>४.नवी मुंबई मनपा<br>५.कल्याण-डोंबीवली मनपा<br>६.भिवंडी मनपा<br>७.उल्हासनगर मनपा<br>८.बदलापुर नपा<br>९. अंबरनाथ नपा. | बृहन्मुंबई मनपा | २४४.०० |
| ३ | नागपुर नागरी समुह | नागपुर मनपा | नागपुर मनपा | ३३.०० |
| ४ | नाशिक नागरी समुह | नाशिक मनपा | नाशिक मनपा | २०.५० |
| ५ | पुणे नागरी समुह | १.पुणे मनपा<br>२.पिंपरी चिंचवड मनपा | पुणे मनपा | ६७.०० |
| ६ | वसई-विरार शहर | वसई-विरार मनपा | वसई-विरार मनपा | १६.०० |
| एकुण रुपये तिनशे शहान्नव कोटी पन्नास लक्ष फक्त | | | | ३९६.५० |

Sharad Gyanoba Kirwale

Digitally signed by Sharad Gyanoba Kirwale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ed23302d612eecfa1f6e35cc7ef096ce9dc6a6c617b767e8f74743b779e2b96, serialNumber=c631899d874203cfe881c8e1591d8fbaa6668e6f09ef06648708b4b914985e5c, cn=Sharad Gyanoba Kirwale
Date: 2020.11.10 15:16:48 +05'30'

(शरद किरवले)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन